**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या विशेष महासभेने पारीत केलेला दि.३०.०३.२०२२ रोजीचा ठराव क्र. ८७ अंशत: महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१(३)) अन्वये, अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-११२२/प्र.क्र.७१/नवि-२८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०३ मे, २०२३

**संदर्भ**:-१) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मिभा/मपना/आयुक्त/२४/२०२२-२३, दि.०३.०६.२०२२.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/लोवि/११२/२२-२३, दि.०५.०७.२०२२.
३) नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र. एएमसी-१४२००/२२६४/प्र.क्र.१४४/नवि-२४, दि.०१.०१.२००२.
४) समक्रमांक शासन निर्णय, दि.१२.१०.२०२२.
५) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/लेखा/६३२/२०२२-२३, दि.२०.०१.२०२३.

**प्रस्तावना**:-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेचे सन २०२२-२३ चे वार्षिक अंदाजपत्रक आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी मंजूरीसाठी महानगरपालिकेच्या स्थायी समितीपुढे सादर केले. सदर अंदाजपत्रकास स्थायी समितीच्या बठैकीमध्ये, ठराव क्र. १५८, दि.१४.०३.२०२२ अन्वये मंजूरी दिली. तद्नंतर महानगरपालिकेच्या महासभेनेही सदर अंदाजपत्रकामध्ये बदल करून ठराव क्र. ८७, दि.३०.०३.२०२२ अन्वये विशेष महासभेत मंजूरी दिली.

तथापि, महासभेने महानगरपालिकेच्या अंदाजपत्रकात केलेल्या बदलानुसार अंमलबजावणी करणे शक्य नसल्याचे, महानगरपालिकेच्या प्रशासनाचे मत असल्याने, उक्त ठराव क्र. ८७ चे अंशत: विखंडन करण्याची आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी दि.०३.०६.२०२२ व दि.०५.०७.२०२२ च्या पत्रांन्वये शासनास विनंती केली.

**२.** मिरा-भाईंदर महानगरपालिका महासभा ठराव क्र. ८७, दि.३०.०३.२०२२ मधील खालील बाबींचे विखंडन करण्याची, आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी शासनास विनंती केली होती.

अ) नगर विकास विभागाच्या दि.०१.०१.२००२ च्या शासन परिपत्रकानुसार, नगरसेवक स्वेच्छा निधी महानगरपालिकेच्या वार्षिक उत्पन्नाच्या जास्तीत जास्त २% असला पाहिजे, अशी तरतूद आहे. त्यानुसार तरतूद न करता नगरसेवक निधीच्या अंदाजात रू. २५ कोटी इतकी भरीव तरतूद महासभेने केली आहे. यास्तव, महासभेने मान्यता दिलेल्या अर्थसंकल्पातील नगरसेवक स्वेच्छा निधीतील तरतूदीबाबत शासन परिपत्रक दि.०१.०१.२००२ च्या तरतूदीनुसार अर्थसंकल्पीत रक्कमेच्या २% निधी (रू. १५ कोटी) नगरसेवक निधी म्हणून वापरण्यास मान्यता द्यावी.

ब) महानगरपालिका प्रशासनाने कोणत्याही प्रशासकीय कामांची यादी महासभेकडे सादर केली नव्हती. परंतु, महासभेने पारित केलेल्या अर्थसंकल्पाच्या ठरावासोबत महानगरपालिकेच्या विविध विभागातील प्रस्तांवाच्या कामांच्या यादीनुसार एकूण ११४ कामांना आर्थिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली. या ११४ कामांच्या, एकूण रू.६१८.४९ कोटींच्या कामांना महासभेने थेट मान्यता दिली आहे. यास्तव, सदर ठरावातील, कामांच्या यादीला मंजूरी दिल्याचा भाग विखंडीत करण्यात यावा.

**३.** मिरा-भाईंदर महानगरपालिका विशेष महासभेने दि.३०.०३.२०२२ रोजी पारीत केलेला ठराव क्र.८७ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने, आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचा प्रस्ताव विचारात घेऊन, शासनास असलेल्या अधिकारानुसार, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१(१) अन्वये दि.१२.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये, सदर अंशत: ठराव दि.१२.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला होता.

**४.** याबाबत आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी दि.२०.०१.२०२३ च्या पत्रात नमूद केल्यानुसार, सदर ठराव मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याचे स्पष्ट होत असल्याने, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या विशेष महासभेने पारित केलेला ठराव क्र.८७, दि.३०.०३.२०२२ हा अंशत:, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अनुसार अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिका विशेष महासभा ठराव क्र. ८७, दि.३०.०३.२०२२ मधील "महानगरपालिकेच्या अंदाजपत्रकासोबत महासभेने परस्पर प्रशासकीय व आर्थिक मंजूरी दिलेली ११४ विकास कामांची यादी" व "नगरसेवक स्वेच्छा निधीसाठी रू. २५ कोटीची केलेली तरतूद" हा भाग महानगरपालिकेच्या आर्थिक तसेच, व्यापक लोकहिताच्या विरूध्द असल्याने तो, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१(३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

**२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०५०३११२९२२४४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CB84E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.05.03 11:35:21 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त तथा प्रशासक, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) निवडनस्ती ( नवि-२८ ).